तमाशा महोत्सव, सन २०२३-२४ आयोजन खर्चास वित्तीय मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. तमाम २८२४(११)/प्र.क्र.८६/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १९ मार्च, २०२४

**वाचा :-** पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. तमाम २८२४(११)/प्र.क्र.८४/सां.का.४ , दिनांक १२ मार्च, २०२४

**प्रस्तावना :-**

तमाशा ही महाराष्ट्रातील एक पारंपारिक कला असुन या कलेतून वगनाटयाद्वारे संगीतमय सादरीकरण होत असते. तमाशा ही जनमानसाचे मनोरंजनातून प्रबोधन करणारी कला आहे. या कलेचे जतन व संर्वधन होण्याच्या दृष्टीने राज्यशासनाच्या वतीने दरवर्षी तमाशा महोत्सवाचे आयोजन करण्यात येते. त्यानुषंगाने, सन २०२३-२४ या वर्षीच्या तमाशा महोत्सवाचे आयोजन खर्चास संदर्भाधिन क्र. २ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. त्यास अनुसरुन आता वित्तीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

तमाशा महोत्सव सन २०२३-२४ आयोजनासाठी रुपये ३४,६३,०००/- (रुपये चौतीस लाख त्रेषष्ठ हजार फक्त) इतक्या रक्कमेस या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२) राज्य कला संस्कृति जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ १५०७) - ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२२/ प्र.क्र.४३/ अर्थ-३, दिनांक ४ एप्रिल, २०२२ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१९१४३६१७१६२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2024.03.19 14:45:34 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री ( सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
११.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१२.निवड नस्ती, सां.का.४.